मराठवाडा व विदर्भातील निवडक जिल्हयातील शेतकऱ्यांना मत्स्यव्यवसायाकरीता मासळी विक्रीसाठी फिरते वाहन उपलब्ध करुन देणे या योजनेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यआ-२०१५/प्र.क्र.१४८/पदुम-१२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०६ नोव्हेंबर, २०१८

**वाचा:-** १) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक क्र. एससीवाय- २०१५/ प्र.क्र.११९/ म-७ (भाग-१),दिनांक २४.७.२०१५.
२) शासन निर्णय क्र.मत्स्यवि-२०१५/प्र.क्र.१४८/पदुम १२, दिनांक ३० जुलै, २०१५

**प्रस्तावना :**

राज्यातील मागील ३-४ वर्षातील दुष्काळ/टंचाई, गारपीट, अवकाळी पाऊस इत्यादि नैसर्गिक आपत्तीमुळे बाधित शेतकऱ्यांच्या आत्महत्या विचारात घेऊन त्या रोखण्यासाठी दिनांक १२.७.२०१५ च्या मंत्रिमंडळ बैठकीत विविध विभागाच्या योजनांबाबत निर्णय झालेला आहे. त्या अनुषंगाने शासन निर्णय क्र.मत्स्यवि-२०१५/प्र.क्र.१४८/पदुम-१२, दिनांक ३० जुलै, २०१५ अन्वये १००% अर्थसहाय्याने मासळी विक्रीसाठी फिरते वाहन उपलब्ध करुन देणे या योजनेस मान्यता देण्यात आली. मात्र सदर १००% अर्थसहाय्यापैकी ४०% अनुदान हे राष्ट्रीय मत्स्यिकी विकास मंडल यांचेकडून प्राप्त न झाल्याने सदर योजना राबविता आली नाही. सद्य:स्थितीत जिल्हा नियोजन समिती (DPC) कडील प्राप्त अर्थसहाय्य हे लाभार्थी व संबंधित सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे खाती जमा असून सदर अर्थसहाय्याच्या मर्यादेत व १०% लाभार्थी हिस्सा अशा एकूण निधीतून मासळी विक्रीसाठी फिरते वाहन उपलब्ध करुन देणे या योजनेस मान्यता देणे ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मराठवाडा व विदर्भातील निवडक जिल्हयातील शेतकऱ्यांना मत्स्यव्यवसायाकरीता "मासळी विक्रीसाठी फिरते वाहन उपलब्ध करुन देणे" या योजनेबाबत धोरणात्मक निर्णय झाला असून सदर योजना राबविण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर योजनेची कार्यपध्दती व अंमलबजावणी पुढीलप्रमाणे राहिल.

१. ही योजना मराठवाडा व विदर्भातील निवडक जिल्हयातील शेतकऱ्यांकरीता कार्यान्वित करण्यासाठी अर्थसहाय्याचा आकृतीबंध खालीलप्रमाणे राहिल.

| | |
|---|---|
| राज्यशासन- जिल्हा नियोजन विकास समिती (DPC) | ९०% |
| लाभार्थी हिस्सा | १०% |
| एकूण | १००% |

२. सन २०१५-१६ अखेर ज्या १० जिल्हयांमध्ये DPC मार्फत प्राप्त झालेली तरतूद व जी लाभार्थी गटाच्या व सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांच्या संयुक्त खाती DBT तत्वावर जमा झाली आहेत त्या मर्यादेतच सदर योजना राबविण्यात येईल.

३. सदर योजना एकूण प्रकल्प किंमत रु.६.६६ लक्ष ज्यामध्ये ९०% जिल्हा नियोजन समितीकडून उपलब्ध झालेला निधी (रु.६.०० लक्ष) व १०% लाभार्थी हिस्सा (रु.०.६६ लक्ष) राहिल या अटीवर योजना सिमित करण्यात येत आहे.

४. या योजनेअंतर्गत ५ जणांच्या शेतकरी गटांना फिरते मासळी विक्री वाहन पुरवठा करण्यासाठी पुरवावयाचे वाहन, वाहनाच्या मागील बाजूस मासळी विक्री, मासे प्रक्रिया करण्यासाठी निर्माण करावयाचा ढाचा व सदर वाहन कार्यान्वीत करण्यासाठीच्या खर्चाचा तपशिल खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | नव्याने प्रस्तावित करावयाची साहित्य/वस्तू | किंमत (लक्ष) |
|---|---|---|
| १ | Vending Stall | ०.६ |
| २ | Kiosks | ०.४ |
| ३ | Mobile Selling units | ४.६९ |
| ४ | Utensils | ०.१२ |
| ५ | Cooking unit | ०.१५ |
| ६ | Refrigerators | ०.४० |
| ७ | Miscellaneous | ०.३० |
| | एकूण | ६.६६ |

५. सदर वाहन व उपरोक्त नमुद साधनसामुग्री याची एकत्रित निविदा आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे काढतील.

६. जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील गठीत समितीने ज्या शेतकरी गटांची निवड केली आहे व ज्यांचे सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय व लाभार्थी गट अशा संयुक्त खाती खालीलप्रमाणे निधी जमा आहे त्यांनाच या योजनेचा लाभ घेता येईल. त्यांचा जिल्हानिहाय तपशिल खालीलप्रमाणे :-

| **अ.क्र.** | **विभाग** | **जिल्हा** | **शेतकरी गट** | **प्राप्त झालेली तरतूद (लाखात)** |
|---|---|---|---|---|
| १ | **अमरावती** | अमरावती | ५ | ३०.०० |
| २ | | अकोला | ५ | ३०.०० |
| ३ | | वाशिम | ५ | ३०.०० |
| ४ | | बुलढाणा | ५ | ३०.०० |
| ५ | | यवतमाळ | ५ | ३०.०० |
| | **एकूण-५** | | **२५** | **१५०.००** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | **नागपूर** | वर्धा | २ | १२.०० |
| | **एकूण-१** | | **२** | **१२.००** |
| १ | **औरंगाबाद** | औरंगाबाद | २ | १२.०० |
| २ | | जालना | ५ | ३०.०० |
| ३ | | बीड | ५ | ३०.०० |
| | **एकूण-३** | | **१२** | **७२.००** |
| १ | **लातूर** | उस्मानाबाद | ५ | ३०.०० |
| | **एकूण-१** | | **५** | **३०.००** |
| | **एकूण विभाग-(४)** | | **४४** | **२.६४ कोटी प्राप्त** |

७. या योजनेअंतर्गत अंमलबजावणीची रुपरेषा खालीलप्रमाणे राहिल.

७.१ प्रत्येक गटास नजिकच्या गावातल्या मच्छिमार संस्थेत सभासद म्हणून समाविष्ट करण्यात येईल.

७.२ गाडी चालविण्याचा अनुषंगिक खर्च व वाहकाची व्यवस्था गटास करावी लागेल.

७.३ गाडीचा विमा काढणे तसेच व्यवस्थापन खर्च ही गटाची जबाबदारी राहील.

७.४ या योजनेतील समाविष्ट शेतकरी गटांना जिल्हास्तरावर मत्स्यव्यवसाय विभागामार्फत मासे हाताळणे, त्यांची विक्री, मासे शितपेटीत जतन करणे, माशांचे विविध खाद्यपदार्थ करुन माशांची हाताळणी व त्यांची विक्री करणे, शिल्लक माश्यांवर प्रक्रिया करणे इ. बाबतचे प्रशिक्षण देण्यात येईल. सदरचे प्रशिक्षण कार्यक्रम जिल्हास्तरावर विभागामार्फत राबविण्यात येईल.

७.५ तसेच प्रत्येक शेतकरी गटांना विक्रीसाठी मासे उपलब्ध करुन देण्यासाठी जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय हे मच्छिमार या गटांचा समन्वय ठेवून त्यांना मदत करतील. आवश्यकता पडल्यास त्यासाठी संस्थेसोबत करार करण्यात येईल.

७.६ त्यांनतर शेतकरी गटांना देण्यात येणारे वाहन हे लाभार्थी गटप्रमुखाचे नावे नोंदणी करण्यात येईल व सदरचे वाहन शेतकरी गटांना विक्री करणे अथवा वाहनाचे हस्तांतरण करणे, या गोष्टी करता येणार नाही. त्याबाबत रु.१००/- चा बाँड पेपर करार करण्यात येईल.

७.७ या योजनेखाली शेतकरी (लाभार्थी गट) ची निवड करणे, त्यांना प्रशिक्षण देणे, वाहन कार्यान्वित करुन देणे व योजना अंमलबजावणीवर देखरेख ठेवणे यासाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी, सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय हे जबाबदार राहतील व प्रादेशिक उपआयुक्त मत्स्यव्यवसाय हे संनियंत्रण अधिकारी राहतील.

७.८ दर तिमाहीमध्ये या योजनेच्या अंमलबजावणीचा आढावा आयुक्त स्तरावर घेतला जाईल व त्याचा अहवाल शासनास सादर करण्यात येईल.

८. जिल्हा नियोजन समिती यांचेकडून प्राप्त झालेल्या निधीतून सदर योजनेचा खर्च भागविण्यात यावा.

९. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३१/१८/व्यय-२ दिनांक ६.३.२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अधीन राहून तसेच नियोजन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८११०६१५५५५३४७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anoop Kumar

Digitally signed by Anoop Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=257f78acf3ca20d9e91d7a73a76aa0240463e4aafdd4d13de68918dc20bad8e6, serialNumber=1c2ee608849bdb812849b6c8878f95607059b530ff717c8e39c09d06b394e02b, cn=Anoop Kumar
Date: 2018.11.06 16:02:49 +05'30'

( अनूप कुमार )
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

(१) महालेखापाल,महाराष्ट्र-१/२(लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर
(२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
(३) मा.मंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
(४) मा.राज्यमंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
(५) मा.मंत्री, मत्स्यव्यवसाय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
(६) मा.राज्यमंत्री, मत्स्यव्यवसाय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
(७) अप्पर मुख्य सचिव, (कृषि विभाग), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
(८) प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
(९) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
(१०)सचिव,(मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
(११)आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य,मुंबई
(१२)मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
(१३)कक्ष अधिकारी, (पदुम-१६), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई
(१४)जिल्हाधिकारी,अमरावती/अकोला/वाशिम/बुलढाणा/यवतमाळ/वर्धा/औरंगाबाद/ जालना/बीड/उस्मानाबाद यांना निर्देशित करण्यात येते की, शेतकऱ्यांच्या सदर

योजनेसाठी देण्यात यावयाच्या अर्थसहाय्यासाठी जिल्हा नियोजन समिती अंतर्गत संबंधित सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांना आवश्यक निधी उपलब्ध करुन दयावा.

(१५)प्रादेशिक उपआयुक्त मत्स्यव्यवसाय, अमरावती/नागपूर/औरंगाबाद/लातूर

(१६)सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, अमरावती/अकोला/वाशिम/बुलढाणा/ यवतमाळ/वर्धा/ औरंगाबाद/ जालना/बीड/उस्मानाबाद.

(१७)सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती/अकोला/वाशिम/बुलढाणा/ यवतमाळ/ वर्धा/ औरंगाबाद/ जालना/बीड/उस्मानाबाद.

(१८)निवड नस्ती.